**प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालयांतील सहायक कक्ष अधिकारी आणि लिपिक-टंकलेखक ही पदे समकक्ष पदांवरील कर्मचाऱ्यांद्वारे अथवा करार पध्दतीने भरण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्राविचौ-१४२३/प्र.क्र.५१/विचौ-२(११-अ)**
मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक - २० जून, २०२५

पहा:- शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र: प्राविचौ-१४२३/प्र.क्र.५१/विचौ-२(११-अ), दि.१०.०७.२०२४

**प्रस्तावना:-**

सहा प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालयांकरीता प्रत्येकी एक सहायक कक्ष अधिकारी आणि एक लिपिक-टंकलेखक अशा एकूण १२ पदांची निर्मिती वरील संदर्भांकित दि.१०.०७.२०२४ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. सदर पदे मंत्रालयातील कर्मचाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने (लिपिक-टंकलेखकाच्या बाबतीत प्रतिनियुक्तीने कर्मचारी उपलब्ध न झाल्यास बाहयसहाय्यित यंत्रणेद्वारे) भरण्याची तरतूद विहित आहे. तथापि, मंत्रालयीन विभागातील कर्मचारी प्रतिनियुक्तीने जाण्यासाठी उपलब्ध होत नसल्याची वस्तुस्थिती विचारात घेता, सदर पदे मंत्रालयीन विभागांतील कर्मचाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीने भरण्याबाबतची तरतूद कायम ठेवण्यात येऊन, सद्यस्थितीत सदर रिक्त पदे समकक्ष कर्मचाऱ्यांमधून भरण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वरील संदर्भांकित दि.१०.०७.२०२४ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२ मधील तरतूदी पुढीलप्रमाणे सुधारण्यात येत आहेत :-

प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालयांतील सहायक कक्ष अधिकारी आणि लिपिक-टंकलेखक ही पदे सामान्य प्रशासन विभागाच्या नियंत्रणाखाली राहतील.

२.१) सदर पदे मंत्रालयीन विभागांतील कर्मचाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरण्यात येतील. दोन्ही संवर्गांच्या प्रकरणी, प्रतिनियुक्तीने पदे भरण्याबाबतची कार्यवाही विचौ-२ कार्यासनाच्या सहमतीने प्रचलित कार्यपध्दतीनुसार, मंत्रालय संवर्ग नियंत्रण करणाऱ्या (प्रशा-३) कार्यासनाकडून करण्यात येईल.

२.२) वरीलप्रमाणे प्रतिनियुक्तीसाठी मंत्रालयीन विभागांतील सहायक कक्ष अधिकारी आणि लिपिक-टंकलेखक उपलब्ध न झाल्यास, ही पदे *संबंधित महसूली विभागांतील*, विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी व अन्य शासकीय कार्यालयांतील, खालील वेतनस्तर असलेल्या **समतुल्य/समकक्ष** पदांवरील कर्मचाऱ्यांमधून बदलीने/प्रतिनियुक्तीने, संबंधित विभागीय आयुक्त कार्यालयांमार्फत भरण्यात येतील :-

| अ.क्र. | पदनाम | वेतनस्तर / ग्रेड वेतन |
|---|---|---|
| १. | सहायक कक्ष अधिकारी | सातव्या वेतन आयोगानुसार वेतनस्तर S-१४ ते S-१६<br>(सहाव्या वेतन आयोगानुसार ग्रेड वेतन रु.४३००/- ते ४६००/- ) |
| २. | लिपिक-टंकलेखक | सातव्या वेतन आयोगानुसार वेतनस्तर S-६<br>(सहाव्या वेतन आयोगानुसार ग्रेड वेतन रु.१९००/-) |

२.३) सहायक कक्ष अधिकारी पदांवर नियुक्तीसाठी वरीलप्रमाणे क्षेत्रिय कार्यालयांतील समतुल्य/समकक्ष कर्मचारी उपलब्ध न झाल्यास, सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१०.०६.२०२५ च्या शासन निर्णयातील तरतुदींनुसार सहायक कक्ष अधिकारी या पदांवर **समतुल्य/समकक्ष** पदांवरुन सेवानिवृत्त झालेल्या शासकीय कर्मचाऱ्यांच्या सेवा करार पध्दतीने संबंधित विभागीय आयुक्त कार्यालयांमार्फत उपलब्ध करुन देण्यात येतील.

२.४) लिपिक-टंकलेखक पदांवर नियुक्तीसाठी वरीलप्रमाणे क्षेत्रिय कार्यालयांतील समतुल्य/समकक्ष कर्मचारी उपलब्ध न झाल्यास, ही पदे संबंधित विभागीय आयुक्त कार्यालयांमार्फत विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यात येतील.

२.५) शासन निर्णय, सा.प्र.वि, दि.१०.०६.२०२५ मधील तरतूदींनुसार, प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी यांच्या कार्यालयांकरीता सेवानिवृत्त शासकीय कर्मचाऱ्यांच्या सेवा करार पध्दतीने उपलब्ध करुन घेण्याबाबतची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे राहील :-

१) प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी यांनी, त्यांच्या कार्यालयांतील रिक्त पदे भरण्याबाबतचे मागणीपत्र संबंधित विभागीय आयुक्त कार्यालयांकडे सादर करावे.

२) विभागीय आयुक्त कार्यालयांनी संबंधित पदे भरण्याकरीता आवश्यकतेनुसार वर्तमानपत्रात जाहिरात प्रसिध्द करावी.

३) जाहिरातीच्या अनुषंगाने, सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांनी संबंधित प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालयांकडे अर्ज करावेत.

४) करार पध्दतीने नियुक्ती करावयाच्या सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांची निवड विभागीय आयुक्तांच्या अध्यक्षतेखालील निवड समितीकडून करण्यात येईल.

५) यासाठी सर्व विभागीय आयुक्त यांच्या कार्यालयांत समिती गठीत करण्यात यावी.

६) विभागीय आयुक्त या समितीचे अध्यक्ष असतील, तसेच प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी हे या समितीचे सदस्य सचिव असतील. अन्य २ सदस्य विभागीय आयुक्त कार्यालयाने नियुक्त करावेत.

७) प्राप्त अर्जांची छाननी करणे, अर्जदारांच्या मुलाखती आयोजित करणे इ. अनुषंगिक कामे प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालयांकडून करण्यात येतील.

८) प्राप्त अर्जाच्या छाननीअंती, उचित उमेदवारांच्या निवडीबाबतचा/मुलाखतीचा प्रस्ताव प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी यांनी निवड समितीस सादर करावा.

९) प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालयांकरीता सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या सेवा करारपध्दतीने उपलब्ध करुन घेतल्याबाबतचे आदेश (नियुक्ती संदर्भातील) संबंधित विभागीय आयुक्त कार्यालयांकडून निर्गमित करण्यात येतील.

२.६) करार पध्दतीने/बाह्ययत्रंणेमार्फत सेवा घेण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांच्या मानधन/ पारिश्रमिक व भत्त्यांचा खर्च सर्व ६ प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी कार्यालयांच्या संबंधित लेखाशिर्षांतर्गत मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६२०१०५८५०६५०७ आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUCHITA MOHAN MAHADIK

Digitally signed by SUCHITA MOHAN MAHADIK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=6578e224c4a0d2c9bfb7e7e33b474757c1425d0a03e653bc4f0a25b70698158e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E146A6DDC8FB6681D49A5099661D41639DA6C568419F071BB9CDFD8A2E08058C, cn=SUCHITA MOHAN MAHADIK
Date: 2025.06.20 11:00:52 +05'30'

**(सुचिता महाडिक)**
**सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१ महाराष्ट्र, मुंबई
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -२ महाराष्ट्र, नागपूर
३) महालेखापाल (लेखा परीक्षा) -१ महाराष्ट्र, मुंबई
४) महालेखापाल (लेखा परीक्षा) -२ महाराष्ट्र, नागपूर
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८) सर्व विभागीय आयुक्त (पत्राने)
९) सर्व जिल्हाधिकारी,
१०) प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, कोकण, पुणे, नाशिक, नागपूर, औरंगाबाद व अमरावती
११) जिल्हा कोषागार अधिकारी, कोकण, पुणे, नाशिक, नागपूर, औरंगाबाद व अमरावती
१२) सर्व मंत्रालयीन विभाग,
१३) मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख तसेच प्रादेशिक विभागप्रमुख,
१४) वित्त विभाग, आ.पु.क., व्यय-४, अर्थसंकल्प-१४
१५) सामान्य प्रशासन विभाग, अर्थसंकल्प शाखा
१६) निवडनस्ती (विचौ-२)